**अपंग व्यक्ती ( समान संधी, संपूर्ण सहभाग व हक्कांचे आरक्षण) अधिनियम, १९९५ नुसार शासकीय परिवहन सेवा कार्यालयातील सरळसेवा पदांवर शारिरीकदृष्ट्या अपंगांसाठी आरक्षण विहित करणे**

**महाराष्ट्र शासन**

सामान्य प्रशासन विभाग,

शासन निर्णय कमांक :-शापसे २०११/ प्र.क. ७ /११/३१,

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,

दिनांक : १२ जानेवारी, २०११

वाचा : (१) अपंग व्यक्ती ( **समान संधी, संपूर्ण सहभाग व हक्कांचे आरक्षण) अधिनियम, १९९५ (क. १/१९९६)**

**(२) शासन परिपत्रक, सा.प्र.वि., क. एसआरव्ही १०९७/प्र.क. १२/१६, दि. २ मे, १९९८**

**(३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क. शापसे १००४/प्र.क. ८५/०४/२८-अ, दि. १० ऑक्टोबर, २००५**

**(४) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क. न्यायाप्र-२००९ / प्र.क. ५ / सुधार-३, दिनांक ३ ऑगस्ट, २०१०**

**प्रस्तावना :**

अपंग व्यक्ती ( समान संधी, संपूर्ण सहभाग व हक्कांचे आरक्षण) अधिनियम, १९९५ ( १९९६ चा क. १) हा अधिनियम, ७ फेब्रुवारी, १९९६ पासून लागू झाला आहे. या अधिनियमास अनुसरुन शासनाने संदर्भ क. २ येथील दि. २ मे, १९९६ च्या शासन परिपत्रकान्वये शासन सेवेत अंध / अल्पदृष्टी, बहिहरेपणा, अस्थिव्यंग किंवा मंदमती या प्रवर्गात समाविष्ट होणाऱ्या अपंग व्यक्तींना सरळसेवा भरतीमध्ये आरक्षण ठेवण्याच्या सूचना प्राप्त झाल्या होत्या. सदर सूचनां विचारात घेऊन संदर्भ क. ३ येथील दि. १० ऑक्टोबर, २००५ च्या शासन निर्णयान्वये शासकीय परिवहन सेवेतील पदांना अपंग आरक्षण लागू केले.

२ या संदर्भात केंद शासनाने अपंग व्यक्ती अधिनियम, १९९५ मधील तरतुदींना अनुसरुन त्यांच्या अखत्यारितील आस्थापनेवरील अपंग व्यक्तींसाठी पदे निश्चित करुन त्यांची यादी प्रसिध्द केली आहे. सदर यादीनुसार विभागाच्या आस्थापनेवरील जी पदे समान आहेत, ती पदे निश्चित करुन तसे आदेश निर्गमित करावेत अशा सूचना सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाने दिनांक ३ ऑगस्ट, २०१० च्या शासन निर्णयान्वये दिल्या आहेत. त्यानुसार, शासकीय परिवहन सेवा कार्यालयाच्या आस्थापनेवरील **गट क मधील** लिपीक- टंकलेखक, समयपाल, नोंदणी सहाय्यक, भांडार सहाय्यक, भांडार खरेदीदार व वेचणीकार आणि **गट ड मधील** शिपाई ही पदे निश्चित करण्यात आलेल्या अपंगत्वाच्या प्रकारात केद शासनाच्या मार्गदर्शक तत्वानुसार सुधारणा करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

३. सामान्य प्रशासन विभागाच्या अखत्यारीतील शासकीय परिवहन सेवा कार्यालयाच्या आस्थापनेवरील गट क व गट ड च्या पदांमध्ये अपंग व्यक्तींसाठी पदे आरक्षित करण्यासाठी निर्गमित करण्यात आलेला संदर्भाधीन दिनांक १० ऑक्टोबर, २००५ चा शासन निर्णय रद्द करण्यात येत आहे.

४ अपंग व्यक्ती ( समान संधी, संपूर्ण सहभाग व हक्कांचे आरक्षण) अधिनियम, १९९५ च्या कलम ३२ व ३३ नुसार शासकीय परिवहन सेवा आस्थापनेवरील गट क व गट ड मधील खालील संवर्गांकरिता सरळसेवा भरतीसाठी एका पायाने विकलांग असलेले (OL), एका हाताने विकलांग असलेले (OA)किवा

मंददृष्टी असलेले (LV) यापैकी अपंग व्यक्तींसाठी प्रत्येकी १ टक्का याप्रमाणे एकूण ३ टक्के आरक्षण ठेवण्यात येत आहे.

| अ.क. | गट क आणि गट ड मधील अपंगांसाठी आरक्षित पदे | अपंग आरक्षणाचा प्रकार |
|---|---|---|
| १ | लिपीक - टंकलेखक - गट -क | OA, OL, LV, |
| २ | नोंदणी सहाय्यक - गट - क | OA, OL, LV, |
| ३ | समयपाल | OA,OL,OAL,BL,LV,HH |
| ४ | शिपाई - गट - ड | OA, OL, OAL, LV, |
| ५ | धुणारा - गट ड | OA,OL,HH |
| ६ | स्वच्छक - गट - ड | OA,OL,LV,HH |
| ७ | झाडूवाला - गट - ड | OL,LV.HH |
| ८ | पहारेकरी - गट ड | OL,BL,HH |

५ अपंग व्यक्ती ( समान संधी, संपूर्ण सहभाग व हक्कांचे आरक्षण) अधिनियम, १९९५ अनुसार अपंग व्यक्तींसाठी शासकीय परिवहन सेवेच्या आस्थापनेवर आरक्षित पदांवर नियुक्तीसाठी संबंधित उमेदवाराने विहित प्राधिकाऱ्याचे किमान ४० टक्के अपंगत्वाचे प्रमाणपत्र सादर करणे बंधनकारक राहील. पसेच, सेवाप्रवेश नियमानुसार विहित करण्यात आलेली अर्हता धारण करणे बंधनकारक राहील. शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क. अपंग १००९/प्र.क. २७६/०९/१६-अ, दि. १९ मार्च, २०१० मधील तरतुदीनुसारं अपंगांची आरक्षित पदे सरळसेवेने भरताना ती सामाजिक प्रवर्गात न दर्शविता ती स्वतंत्रपणे दर्शविण्यात येवून निवड झालेल्या अपंग उमेदवारांना ते ज्या सामाजिक प्रवर्गातील असतील त्या प्रवर्गात समांतर आरक्षण म्हणून सामावून घेण्यात येईल.

६ पदोन्नतीच्या पदास व एकाकी पदास अपंगाचे आरक्षण लागू नाही.

७ केंद शासनाच्या यादीतील पदांव्यतिरिक्त जी पदे शासकीय परिवहन सेवा कार्यालयाच्या आस्थापनेवर आहेत, अशा ४८ संवर्गातील पदांचे अपंगांसाठी पद निश्चित करणेबाबतचे आदेश तज्ञ समितीच्या मान्यतेनंतर स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील.

८ हे ओदश सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या संदर्भ क. ४ येथील आदेशान्वये प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

९ सदर शासन निर्णय महाराष्ट् शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक 201101131459570001 असा आहे.

महाराष्टाचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

(स.आ.कानेटकर)
कार्यासन अधिकारी, सामान्य प्रशासन विभाग

प्रति,

१. मा.राज्यपालांचे सचिव,
२. मा.मुख्यमंत्र्यांचे सचिव,
३. आयुक्त, अपंग कल्याण, ३ चर्च रोड, पुणे,
४. मा.मंत्री, राजशिष्टाचार यांचे स्वीय सहायक,
५. मा.राज्यमंत्री, राजशिष्टाचार यांचे स्वीय सहायक,

६. मा.मुख्यसचिव यांचे स्वीय सहायक,
७. उप सचिव, सा.प्र.वि. का.१६-अ, मंत्रालय, मुंबई,
८. उप सचिव, सा.प्र.वि. का.१९-अ, मंत्रालय, मुंबइ
९. उप सचिव, सा.न्या. व वि.स.वि./सुधार-३, मंत्रालय, मुंबइ
१०. निवड नस्ती.